**मुंबई महानगरपालिका अधिनियम-१८८८ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम-१९४९ मधील तरतुदीनुसार एक टक्का अतिरिक्त मुद्रांक शुल्क अधिभारापोटी जमा रक्कमेमधून नागपूर मेट्रो टप्पा-१, पुणे मेट्रो रेल टप्पा-१ व मुंबई मेट्रो मार्ग-३ प्रकल्पांकरीता आंतरराष्ट्रीय बँकांकडून घेण्यात आलेल्या कर्जाची परतफेड केंद्र शासनाने राज्याच्या एकत्रित निधीतून परस्पर वळती केलेल्या माहे मार्च, २०२३ पर्यंत थकीत असलेली मुद्दल व व्याजाची रक्कम रू. १५६३.०१ कोटी रकमेचे समायोजन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२३/प्र.क्र.९० (भाग-२)/नवि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २६ मार्च, २०२४.

**वाचा :**

१. महाराष्ट्र शासन राजपत्र अधिसूचना असाधारण क्र. ५६ दि. २१.०८.२०१५.
२. महाराष्ट्र शासन राजपत्र भाग एक-अ नागपूर विभागीय पुरवणी अधिसूचना दि.३०.०६.२०१६.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१९/प्र.क्र.६१/नवि-७, दिनांक १० सप्टेंबर, २०२०.

**प्रस्तावना :-**

नागपूर मेट्रो टप्पा-१ करिता केएफडब्लु व एएफडी या आंतरराष्ट्रीय बँकांकडून, पुणे मेट्रो रेल टप्पा-१ करीता एएफडी व ईआयबी या आंतरराष्ट्रीय बँकांकडून व मुंबई मेट्रो मार्ग-३ करीता जायका या आंतरराष्ट्रीय बँकेकडून घेण्यात आलेल्या कर्जाची परतफेड करण्यासाठी माहे मार्च, २०२३ पर्यंत थकीत असलेली मुद्दल व व्याजाची रक्कम अनुक्रमे रू. ७६३.५३ कोटी, रु. ५५.५३ कोटी व रू. ७४३.९५ कोटी अशी एकूण रू. १५६३.०१ कोटी केंद्र शासनाने, केंद्र शासनाद्वारे राज्य शासनाच्या एकत्रित निधीतून परस्पर वळती करून सदर रकमेची संबंधित वित्तीय संस्थांना परतफेड केली आहे. उपरोक्त मेट्रो प्रकल्पांकरिता उभारण्यात आलेल्या बाह्य सहाय्यित कर्जाची परतफेड करण्याची संपूर्ण जबाबदारी हि संबंधित प्रकल्प अंमलबजावणी संस्थेची असल्याने संदर्भिय क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये अनुज्ञेय असलेल्या एक टक्के अतिरिक्त मुद्रांक शुल्क अधिभारापोटी वसूल करण्यात आलेल्या व सन २०२३-२४ मध्ये मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून राज्य शासनाला परत करण्याचा (समायोजन) करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. एक टक्का अतिरिक्त मुद्रांक शुल्क अधिभारापोटी सन २०२३-२४ मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून खालील **विवरणपत्र-अ** दर्शविल्याप्रमाणे **एकूण रु.१५६३.०१ कोटी** इतका निधी समायोजनाने वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

## विवरणपत्र अ
## सन २०२३-२४ मध्ये वितरीत करावयाचे अनुदान

| अ.क्र. | खर्चाचा तपशील | रक्कम (रुपये कोटी मध्ये) | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| मागणी क्रमांक एफ-५, ४२१७-नगर विकासावरील भांडवली खर्च, ६०- नगर विकास विभाग इतर योजना, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका | | | |
| १. | मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्प मुद्रांक शुल्क अधिभाराचे प्रदान सांकेतांक क्र. (४२१७०८०१) | ७४३.९५ | ६००४, केंद्र शासनाकडून कर्जे व आगाऊ रकमा, ०९ राज्यांना/विधानमंडळे असलेल्या केंद्रशासित प्रदेशांना इतर कर्जे, १०१ गट कर्जे, (०१) बाह्य सहाय्यित प्रकल्प, (०१) (०१) बाह्य सहाय्यित प्रकल्प **(संकेतांक क्र.६००४५२०२)** |
| | पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्प मुद्रांक शुल्क अधिभाराचे प्रदान सांकेतांक क्र. (४२१७०८२८) | ५५.५३ | |
| | नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्प मुद्रांक शुल्क अधिभाराचे प्रदान सांकेतांक क्र. (४२१७०८१९) | ५२६.४६ | |
| २ | नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्प मुद्रांक शुल्क अधिभाराचे प्रदान सांकेतांक क्र. (४२१७०८१९) | १२४.२३ | ००४९ व्याजाच्या जमा रकमा, ०४, राज्य/संघराज्य क्षेत्र शासनाच्या व्याजाच्या जमा रकमा, ११०, रोख शिलकीच्या गुंतवणुकीद्वारे मिळालेले व्याज, (००) (००) (०१) रोख शिलकीच्या गुंतवणुकीद्वारे मिळालेले व्याज **(संकेतांक क्र. ००४९००७२)** |
| | **एकूण** | **१५६३.०१** | |

२. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५ (रोखशाखा) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव, नवि-५ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि-३१ कार्यासनाने करावी. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम उपरोक्त **विवरणपत्र-अ** मध्ये नमूद केल्याप्रमाणे समायोजनाची कार्यवाही करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोखशाखेने देयक तयार करून ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे पाठवावे. सदर निधी वितरण हे **बिनशर्त** स्वरूपाचे आहे.

३. सदर समायोजनाची नोंद मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन, मुंबई व महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन, नागपूर यांनी घ्यावी. त्याचबरोबर केंद्र शासनाने वळती करून घेतलेल्या रकमेचा खर्चमेळ करून त्याबाबतचा अहवाल तात्काळ शासनास सादर करावा.

४. सदर निधी वितरण आदेश वित्त विभागाचा अनौ. संदर्भ २३२/व्यय-३ व ८६/२०२३/ऋण व हमी, दि. २०/०३/२०२४ अन्वये प्राप्त अभिप्राय व सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३२६१३०११७४५२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.03.26 17:05:41 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
६. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन, मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन, नागपूर
८. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३. सह सचिव, (अर्थसंकल्प-१६), (व्यय-३), (अर्थबळ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. सह सचिव, न.वि.-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. कक्ष अधिकारी नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. लेखाधिकारी, नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. रोख शाखा (३ प्रती)
18. निवड नस्ती, नवि-७.